**मुंबई वाहतूक पोलीस विभागांतर्गत असलेल्या शिक्षण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या सन २०१८-१९ च्या वार्षिक उपक्रमासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांक : टिआरए-१२१८/प्र.क्र.१६६/पोल-८**
दुसरा मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
**दिनांक :- २७ डिसेंबर, २०१८**

वाचा -
१) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्र. जा.क्र.१९५/पोआ/कक्ष-१४/अर्थसं/टे-५/१८, दि.६.११.२०१८
२) सह पोलीस आयुक्त (वाहतूक), वरळी, मुंबई यांचे पत्र क्र. ४२४७/अपोआ/वा/शैक्षणिक उपक्रम, दि.२५.१०.२०१८,
३) सह पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्र. शा. जा. क्र. ४८४५/अपोआ/शैक्षणिक उपक्रम २०१८, दि.१८.१२.२०१८
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, यांचे शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि. ३०.१०.२०१५

**शासन निर्णय :**

मुंबई वाहतूक पोलीस विभागाकडून मुंबई शहरातील शाळांच्या सहभागाने रस्ता सुरक्षा दलांतर्गत दरवर्षी विविध उपक्रम राबविण्यात येतात. मुंबई वाहतूक पोलीस विभागांतर्गत असलेल्या शिक्षण विभागामार्फत राबविण्यात आलेल्या सन २०१८-२०१९ च्या वार्षिक उपक्रमासाठी येणा-या खर्चाची परीपुर्ती करण्यासाठी **रुपये ३१,६५,०१३ /- (अक्षरी रु. एकतीस लाख पासष्ठ हजार तेरा फक्त )** इतक्या खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च मुख्यलेखाशिर्ष " बी-१, २०५५, पोलीस १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२), शहर पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना, (२०५५ ००९७) १३ कार्यालयीन खर्च " या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर उपक्रमासाठी आवश्यक असलेल्या वस्तु व सेवा विकत वा भाडयाने घेतांना, शासनाने विहीत केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करावा. तसेच उपक्रमाकरीता केलेल्या खर्चाचा संपूर्ण तपशील त्वरीत सादर करावा.

४. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तीका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग ३, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७ (२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२७१५४२१८९८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhaker D. Pawar

Digitally signed by Sudhakar D. Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2c1ebd27661971090dc2c91d4bb9caabd4da394aa85829a09265097faf097ba5, cn=Sudhakar D. Pawar
Date: 2018.12.27 15:47:53 +05'30'

**( सु. धों. पवार )**
**अवर सचिव, गृह विभाग**

**प्रति,**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२. सह पोलीस आयुक्त (वाहतूक), वरळी, मुंबई.
३. महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
४. महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
७. उप सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (पोल-८)